**केंद्र शासनाकडून राज्यास भांडवली खर्चासाठी कर्ज स्वरुपात विशेष सहाय्य योजना भाग-१ अंतर्गत (बिनव्याजी कर्ज) महावितरण व महानिर्मिती कंपनीला रु. २८८.३७७९ कोटी निधी वितरित करणेबाबत सन २०२३-२४ के-११ (लेखाशिर्ष-६८०१०७१८)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३०/ऊर्जा-३,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२४.

**संदर्भः-**

१. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.११२/ऊर्जा-३, दि. १६/११/२०२२.
२. भारत सरकार,वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.no.४४(१))/pf-s/२०२३-२४ (CAPEX), दि.२८/०६/२०२३.
३. शासन पत्र वित्त विभाग क्र. संकीर्ण -२०२३/प्र.क्र.०९/अर्थबळ, दि.०४/०७/२०२३.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३.
५. भारत सरकार,वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.no.४४(१))/pf-s/२०२३-२४ (CAPEX) Maharashtra -SACE-७१, दि.०८/०३/२०२४.
६. शासन पत्र वित्त विभाग क्र. संकीर्ण -२०२२/प्र.क्र.१४/अर्थबळ,दि.११/०३/२०२४.
७. शासन निर्णय उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३०/ऊर्जा-३,/दि. ०९/१०/२०२३.
८. शासन निर्णय उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३०/ऊर्जा-३,/दि. १०/०१/२०२४.

**प्रस्तावना :-**

१. केंद्र शासनाने राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी कर्ज उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता लेखाशिर्ष ६८०१०७१८ खाली ऊर्जा विभागाला रु.१५००.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आले आहेत. राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजना सन २०२३-२४ अंतर्गत भाग-१ करिता ऊर्जा विभागाच्या पाच प्रकल्पाकरिता केंद्र शासनाने रु.१०००.०० कोटी इतका निधी मंजूर केला आहे.सदर मंजूर तरतूदीपैकी रु.६६६.७० कोटी इतका निधी संदर्भ क्र. ७ व ८ अन्वये रोखीने वितरित करण्यात आला आहे.

२. संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये वित्त विभागाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. १०००.०० कोटीपैकी रु.२८८.३७७९ कोटी इतका निधी महावितरण व महानिर्मिती कंपनीला रोखीने वितरित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-१ खाली सन २०२३-२०२४ मध्ये अर्थसंकल्पिय तरतूद रु.१०००.०० कोटी मधून महावितरण व महानिर्मिती कंपनीकडील खालील नमूद प्रकल्पांकरिता **रु.२८८,३७,७९,०००/- (रुपये दोनशे अठ्ठ्याऐंशी कोटी सदतीस लाख एकोणऐंशी हजार फक्त)** इतकी बिनव्याजी कर्ज रक्कम खालील प्रकल्पांना रोखीने वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

**(रु. कोटीत)**

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्पाचे स्वरुप | मंजूर निधी | आतापर्यंत वितरित निधी | वितरीत करावयाची रक्कम | अंमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी प्रणाली मजबूतीकरण योजना २.० | नवीन प्रकल्प | ५०४.२७ | ३३८.०० | १६६.२७ | महावितरण |
| २ | मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी प्रणाली मजबूतीकरण योजना २.० | नवीन प्रकल्प | २५३.४० | १६८.७० | ८४.७० | महावितरण |
| ३ | ग्रीन हायड्रोजन प्रकल्प | नवीन प्रकल्प | ९.०० | ९.०० | ०.०० | महानिर्मिती |
| ४ | ६२ मे.वॅ. पारस सौर वीज प्रकल्प सबस्टेशन | नवीन प्रकल्प | १७५.०० | ११०.०० | ३७.४०७९ | महानिर्मिती |
| ५ | बंडलिंग योजेनेकरिता ६०० मे.वॅ. सौर वीज प्रकल्प | नवीन प्रकल्प | ५८.३३ | ४१.०० | ०.०० | महानिर्मिती |
| | **एकूण** | | **१०००.००** | **६६३.७०** | **२८८.३७७९** | |

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र. के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, (००), (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमांना कर्जे, (०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्जे (केंद्र हिस्सा १००%), (००) (०१) महानिर्मिती, महापारेषण आणि महावितरण कंपनीच्या पायाभूत प्रकल्पासाठी बिनव्याजी कर्ज (योजना भाग-१) (६८०१०७१८)(कार्यक्रम) ५५,कर्जे व अगाऊ रकमा” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त लेखाशिर्षाखालील निधी आहरित करण्यासाठी ऊर्जा विभागाचे “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून डॉ.गौरी पाटील, कार्यासन अधिकारी (उर्जा-३) आणि “नियंत्रण अधिकारी” म्हणून श्री. ना. श्री. कराड, उप सचिव, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर मंजूर झालेली रक्कम **रु.२८८.३७७९ कोटी (रुपये दोनशे अठ्ठ्याऐंशी कोटी सदतीस लाख एकोणऐंशी हजार फक्त)** अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित व महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित यांचे नावे स्वतंत्रीत्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर योजनांचे अंमलबजावणीसाठी प्रशासकीय विभाग स्तरावर State Scheme Manager (SSM) म्हणून, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांची निवड केली असून ते सदर योजनेचे Single Nodal Agency (SNA) म्हणून काम पाहतील. तसेच First Level Agency म्हणून कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग हे काम पाहतील.

५. सदर निधी आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे देयके सादर करुन प्राप्त निधी महावितरण कंपनी व महानिर्मिती कंपनी, वांन्द्रे पुर्व, मुंबई-५१ यांना देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही“ऊर्जा-३” कार्यासनाने करावी.

६. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत भाग १-खाली प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमांसाठी महावितरण व महनिर्मिती कंपनीने महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावेत.

७. केंद्र शासनाने ज्या प्रकल्पांसाठी निधी मंजूर केला आहे,त्याच प्रकल्पासाठी व त्यातील प्रयोजनासाठीच निधी खर्च होईल, याची महावितरण कंपनी व महानिर्मिती कंपनी यांनी खबरदारी घ्यावी व अशा खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

८. सदर योजनेच्या भाग-१ खाली केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज "००४९ व्याजाच्या जमा रक्कमा, १९० सार्वजनिक क्षेत्र व उतर उपक्रम यांजकडून व्याज, (०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज मंडळाला दिलेल्या कर्जावरील व्याज, ००४९०७३१" या लेखाशीर्षाखाली राज्य शासनाकडे तातडीने जमा करावे व भरणा केलेला रकमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

९. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर बिनव्याजी कर्जासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधित अटी व शर्ती लागू राहतील. सदर बिनव्याजी कर्ज रक्कम वितरणासाठी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ मधील परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील संबंधित सर्व अटीची पूर्तता होत आहे.

१०. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर` करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, सदर देयक हे सशर्त असून या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे पत्र क्र.संकीर्ण-२०२३/१४/अर्थबळ,दि.११/०३/२०२४ रोजीच्या प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३१५११२२३९२०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. GAURI RAKESH PATIL

Digitally signed by DR. GAURI RAKESH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=1fb6342b2e518b7b62c5e76771a2798f4bed2e746f3e27ba3a43ef40e20d8979, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B8FA6FD8474E1D5982D81B6510A6CD24CC422976DC8735D4C6A4C519341E344, cn=DR. GAURI RAKESH PATIL
Date: 2024.03.15 16:39:17 +05'30'

**(डॉ.गौरी पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (ऊर्जा) , यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा. मंत्री,यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधीपक्ष नेता ( विधानसभा व विधानपरिषद) मुंबई-३२यांचे खाजगी सचिव.
७. मा. मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२.

९. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२.
१०.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२.
११.संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या., मुंबई,
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,५१.
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,५१
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
१५.महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७.अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
१८. अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१९.वित्त विभाग/(अर्थबळ/अर्थसंकल्प-३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
२०. निवड नस्ती, ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.